संयुक्त वन व्यवस्थापन कार्यक्रम अंतर्गत संत तुकाराम वनग्राम योजनेच्या बक्षिस वितरणाकरिता चालू बाब प्रस्ताव.
सन २०१४-१५.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एफडीएम-२०१४/प्र.क्र.१८४/फ-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०००३२
तारीख: १२ फेब्रुवारी, २०१५

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अंदाज-२०१४/प्र.क्र.११०/अर्थ-३, दि.०१.०७.२०१४.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/इए/संवव्य/चाबाप्र/प्र.क्र.४(१४-१५)/७२५, दि.३०.०७.२०१४.
३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.एफडीएम-२०१४/प्र.क्र.१८४/फ-२, दि.१९.०८.२०१४
४) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र. अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दि.०९.०२.२०१५

**प्रस्तावना :-**

सन २०१४-१५ या वार्षिक योजनेमध्ये राज्य योजनाअंतर्गत " ग्राम परिसर व आदिवासी विकास कार्यक्रम" (२४०६ १५२१) या योजनेअंतर्गत संयुक्त वन व्यवस्थापन कार्यक्रमासाठी रु.१५७४.९७ लक्ष इतका नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. सदर योजनेअंतर्गत संत तुकाराम वनग्राम योजनेच्या बक्षिस वितरणाकरिता ०५ बक्षिसे व १६ प्रकाशने या उद्दिष्टाअंतर्गत एकूण रु.६२.९६ लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे.

२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचेकडून संदर्भ क्र.२ येथील दि.३०.०७.२०१४ च्या पत्रान्वये रु.६४.०४ लक्ष रक्कमेचा प्रस्ताव या विभागास प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने रु.२६.४५ लक्ष इतकी रक्कम या विभागाच्या संदर्भ क्र.३ वरील दि.१९.०८.२०१४ च्या शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आलेली आहे.

३. सन २०१४-१५ च्या उर्वरीत कालावधीकरिता अर्थसंकल्पित असलेल्या निधीच्या ७५ % मर्यादेत निधी वितरीत करण्याच्या सूचना वित्त विभागाने संदर्भ क्र.४ येथील दि.०९.०२.२०१५ रोजीच्या परिपत्रकान्वये दिलेल्या आहेत. सदर योजनेचा प्रस्ताव हा २४०६ १५२१ या संकेतांकाअंतर्गत अर्थसंकल्पित असलेल्या रक्कमेच्या ७५ % मर्यादेत असल्यामुळे उक्त योजनेकरिता प्रस्तावांतर्गत उर्वरित निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

४. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.४ येथील दि.०९.०२.२०१५ रोजीच्या परिपत्रकामध्ये दिलेल्या सूचना विचारात घेता,सदर योजनेचा प्रस्ताव हा २४०६ १५२१ या संकेतांकाअंतर्गत अर्थसंकल्पित असलेल्या रक्कमेच्या ७५ % मर्यादेत असल्यामुळे प्रस्तावांतर्गत रु.६४.०४ लक्ष रक्कमेपैकी रु.२६.४५ लक्ष इतकी रक्कम वितरित केल्यानंतर उर्वरित रु.३७.५९ लक्ष इतका निधी खालीलप्रमाणे वितरित व खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे :-

**(रु.लाखात)**

| सविस्तर लेखाशीर्ष / उद्दिष्ट | प्रस्तावांतर्गत मागणी केलेली रक्कम | सन २०१४-१५ करिता अर्थसंकल्पित नियतव्यय | वितरीत केलेली रक्कम | **या शासन निर्णयान्वये वितरीत करावयाची रक्कम** |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| ०५ बक्षिसे | ४९.०९ | ४८.१६ | २०.२३ | **२८.८६** |
| १६ प्रकाशने | १४.९५ | १४.८० | ६.२२ | **८.७३** |
| **एकूण** | **६४.०४** | **६२.९६** | **२६.४५** | **३७.५९** |

५. वरील प्रमाणे ०५ बक्षिसे व १६ प्रकाशने या उद्दिष्टांमध्ये आवश्यक असलेला एकूण निधी हा मुळ तरतूदीपेक्षा (स्तंभ क्र. ३) अधिक असल्यामुळे २४०६ १५२१ या लेखाशीर्षाअंतर्गत खालीलप्रमाणे पुनर्वितरण करण्यात यावे :-

**(रुपये लाखात)**

| सविस्तर लेखाशीर्ष / उद्दिष्ट | मुळ तरतूद | प्रस्तावांतर्गत मागणी केलेली रक्कम | पुनर्वितरणाद्वारे कमी/जास्त करावयाचे अनुदान | पुनर्वितरणा नंतरचे अंतिम अनुदान |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| ०५ बक्षिसे | ४८.१६ | ४९.०९ | (+) ०.९३ | ४९.०९ |
| १३ कार्यालयीन खर्च | ९.८० | ०.०० | (-) १.०८ | ८.७२ |
| १६ प्रकाशने | १४.८० | १४.९५ | (+) ०.१५ | १४.९५ |
| **एकूण** | **७२.७६** | **६४.०४** | | **७२.७६** |

६. सदरहू निधी मागणी क्र.सी-७, प्रधान शीर्ष २४०६ वनीकरण व वन्य जीवन, १०१(११) वन संरक्षण, विकास व पुनर्निमिती, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना (११)(१०) ग्राम परिसर व आदिवासी विकास कार्यक्रम (२४०६ १५२१) या लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ मध्ये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या अनुदानामधून खर्च करण्यात यावा.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दि.०९.०२.२०१५ च्या परिपत्रकान्वये आणि वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र/१००८/प्र.क्र.७०/२००८/ विनियम, दिनांक १५.०५.२००९ भाग पहिला, उपविभाग-३, परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२१२१७५३४५९५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

Dattatraye Laxman Thorat

Digitally signed by Dattatraye Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dattatraye Laxman Thorat
Date: 2015.02.12 18:03:34 +05'30'

**( द.ल.थोरात )**

**सह सचिव**

**महसूल व वन विभाग**

**प्रतिलिपी :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर

२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव)/(उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर

३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर

४) सर्व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक.

५) सर्व मुख्य वनसंरक्षक (प्रा.)/मुख्य वनसंरक्षक (धोरण व तंत्रज्ञान)/(संयुक्त वनव्यवस्थापन व नियोजन)

६) महासंचालक, सामाजिक वनीकरण विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे

७) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर

८) सह सचिव / उप सचिव, वित्त विभाग (अर्थ-३) / (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२.

९) उप सचिव, नियोजन विभाग (१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.

१०) ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

११) निवडनस्ती, फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग.